**अस्थायी शासकीय कर्मचाऱ्यांना/अधिकाऱ्यांना**
**<u>स्थायित्व प्रमाणपत्र उपलब्ध करुन देणेबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः स्थाप्रप-१४१४/(प्र.क्र.७३/१४)/१३-अ**
सामान्य प्रशासन विभाग
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक ११ सप्टेंबर, २०१४

**<u>वाचा :-</u>**

१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः एसआरव्ही-१०७५-दहा, दिनांक १९ सप्टेंबर, १९७५.
२. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः एसआरव्ही-१०७५-दहा, दिनांक २ जानेवारी, १९७६.
३. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक: स्थाप्रप-१०८५/५८६/प्र-५५/तेरा-अ, दिनांक २८ ऑगस्ट, १९८५.
४. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक: स्थाप्रप-१०९३/२६४०/ प्र.क्र.९८/९३/१३-अ, दिनांक १६ डिसेंबर, १९९५.
५. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक: स्थाप्रप-१०९३/२६४०/ प्र.क्र.९८/९३/१३-अ, दिनांक ६ फेब्रुवारी, १९९६.
६. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक: स्थाप्रप-१०९९/प्र.क्र.४८/९९/१३-अ, दिनांक १८ ऑगस्ट, १९९९.

**<u>प्रस्तावना :-</u>**

विहित पद्धतीने नियुक्त झालेल्या अस्थायी शासकीय कर्मचाऱ्यांच्या बाबतीत, त्या कर्मचाऱ्याची नियुक्ती करण्यास सक्षम असणाऱ्या प्राधिकाऱ्याने, तो कर्मचारी विहित शर्तींनुसार पात्र होताच त्याला स्थायित्व प्रमाणपत्र देणे आवश्यक आहे. या संबंधातील सूचना उपरोक्त संदर्भांकित शासन निर्णय/परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या आहेत. असे निदर्शनास येते की, अशी प्रमाणपत्रे वेळच्यावेळी दिली जात नाहीत आणि दिल्या गेलेल्या प्रमाणपत्राची नोंद संबंधित कर्मचाऱ्यांच्या सेवापुस्तकात घेतली जात नाही. त्यामुळे स्थायित्व प्रमाणपत्र मिळण्यास पात्र असूनही केवळ तसे प्रमाणपत्र दिले न गेल्यास कर्मचाऱ्यांस अवाजवी अडचणी येतात. तसेच सामान्य प्रशासन विभागाकडे यासंबंधात मार्गदर्शनार्थ संदर्भ प्राप्त होतात. त्यामुळे उपरोक्त शासन निर्णय/परिपत्रकातील सूचना सर्व नियुक्ती प्राधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे.

## शासन परिपत्रक:-

प्रत्येक अस्थायी शासकीय कर्मचाऱ्यास/अधिकाऱ्यांस स्थायित्व प्रमाणपत्र प्रथम पदावरील नियुक्तीच्या संदर्भात देणे आवश्यक आहे. त्यामुळे उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णय/परिपत्रके अधिक्रमित करुन त्यामधील सुचनांचा एकत्रित विचार करुन स्थायित्व प्रमाणपत्र देण्यासंदर्भात पुढील सूचना देण्यात येत आहेत.-

१. प्रथम नियुक्तीच्या पदावर ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण करणाऱ्या व पुढील शर्तींची पूर्तता करीत असलेल्या अस्थायी शासकीय कर्मचाऱ्यांपैकी गट-अ व गट-ब (राजपत्रित) अधिकाऱ्यांच्या बाबतीत संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्याने, तसेच गट-ब (अराजपत्रित), गट-क व गट-ड कर्मचाऱ्यांच्या बाबतीत संबंधित कार्यालय प्रमुखाने स्थायित्व प्रमाणपत्र देणे आवश्यक आहे.:-

[१] **कर्मचाऱ्याची नियुक्ती सेवाप्रवेश नियमानुसार व विहित पद्धतीने होणे,**

[२] **कर्मचारी सेवेस पात्र असल्याबाबतचे वैद्यकीय प्रमाणपत्र असणे व कर्मचाऱ्याने सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा उत्तीर्ण होणे,**

[३] **कर्मचाऱ्याचा सेवाभिलेख (उदा. गोपनीय अहवाल, उपस्थिती, सचोटी इत्यादि) चांगला असणे.**

२. प्रत्येक पात्र अस्थायी कर्मचाऱ्यांना योग्य त्या सक्षम प्राधिकाऱ्याच्या सहीने स्थायित्व प्रमाणपत्र, सोबत जोडलेल्या **परिशिष्ट-"अ"** येथील नमुन्यात विनाविलंब देण्याची आणि त्याची नोंद सेवापुस्तकात घेण्याची दक्षता संबंधित नियुक्ती प्राधिकारी/ कार्यालय प्रमुखांनी घ्यावी.

३. संबंधित कर्मचाऱ्याला तो स्थायित्व प्रमाणपत्र मिळण्यास ज्या दिनांकापासून पात्र ठरेल त्या दिनांकापासून ते देण्यात यावे. एखाद्या कर्मचाऱ्याच्या संबंधात स्थायित्व प्रमाणपत्र न देण्याचा निर्णय जाणीवपूर्वक घेण्यात आला असेल तर, त्याबाबत संबंधित कर्मचाऱ्यास स्थायित्व प्रमाणपत्र न देण्यामागची कारणे नमूद करुन कळविण्यात यावे व त्याबाबतची नोंद त्या-त्या वेळी संबंधित कर्मचाऱ्याच्या सेवापुस्तकात घेण्यात यावी.

४. ज्या प्रकरणामध्ये स्थायित्व प्रमाणपत्र देण्यापूर्वी जर कर्मचाऱ्याची पदोन्नती, बदली अथवा अन्यत्र सामावून घेण्याची कार्यवाही झाली असेल तर, सदर कर्मचारी नियुक्तीपासून कार्यरत असलेल्या कार्यालयाकडून/कार्यालयांकडून उपरोक्त सूचना क्र. १ येथील तीनही अटींची पूर्तता संबंधित कर्मचारी करीत होता किंवा कसे याबाबतची माहिती त्याच्या सध्याच्या कार्यालयाने उपलब्ध करुन घेऊन अशा कर्मचाऱ्यास तो पात्र ठरत असलेल्या पूर्वीच्या पदाचे स्थायित्व प्रमाणपत्र द्यावे.

५. वरीलप्रमाणे स्थायित्व प्रमाणपत्र प्रथम नियुक्तीच्या पदावर द्यावयाचे असले आणि गट-अ पदावर कार्यरत शासकीय अधिकाऱ्यांना पूर्वी अराजपत्रित पदावर काम करतांना स्थायित्व लाभ प्रमाणपत्र मिळालेले असले तरी, ते धारण करीत असलेल्या गट-अ च्या पदावर उपरोक्त सूचना क्र.१ येथील तीनही अटींची पूर्तता करीत असल्यास त्यांना नव्याने स्थायित्व लाभ प्रमाणपत्र देण्यात यावे.

६. आपल्या कार्यालयांतर्गत कार्यरत असलेल्या व ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण करणाऱ्या पात्र अस्थायी शासकीय कर्मचाऱ्यांना स्थायित्व प्रमाणपत्र देण्याबाबतचा निर्णय नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी/ कार्यालय प्रमुखांनी प्रत्येक वर्षात दि. ३० नोव्हेंबर पर्यंत घ्यावा व या दिनांकापर्यंतची स्थिती दर्शविणारा वार्षिक अहवाल त्याच वर्षी दि. १५ डिसेंबर पूर्वी तयार करावा. सदर अहवालामध्ये संबंधित कार्यालयातील शासकीय कर्मचाऱ्यांची संवर्गनिहाय एकूण संख्या, त्यापैकी स्थायित्व प्रमाणपत्र धारकांची संख्या, त्यापैकी सेवापुस्तकात स्थायित्वाची नोंद घेण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांची संख्या, पात्र असलेल्या तथापि स्थायित्व प्रमाणपत्र अद्याप न देण्यात आलेल्या अस्थायी कर्मचाऱ्यांची संख्या, स्थायित्वासाठी विचार करण्यात आलेल्या तथापि विहित अटींची पूर्तता होत नसल्यामुळे स्थायित्व प्रमाणपत्र न देण्याचा जाणीवपूर्वक निर्णय घेण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांची माहिती (नकाराच्या कारणासह) या मुद्यांची माहिती असावी.

७. सर्व मंत्रालयीन विभागांनी खुद्द विभागातील तसेच त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील नियुक्ती प्राधिकारी/ कार्यालय प्रमुख यांच्याकडील अहवाल दि. ३१ डिसेंबर पूर्वी संकलित करावेत व स्थायित्व प्रमाणपत्र देण्याबाबतच्या प्रकरणी निर्णय घेण्यास संबंधित नियुक्ती प्राधिकारी/ कार्यालय प्रमुख यांच्याकडून अकारण विलंब होणार नाही याकडे लक्ष पुरवावे.

२. पात्र अस्थायी शासकीय कर्मचाऱ्यांना द्यावयाच्या स्थायित्व प्रमाणपत्र देण्याचा नमूना सदर परिपत्रकासोबत जोडला आहे.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१४०९१११११२०१०६१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Venkatesh Madhav Bhat

Digitally signed by Venkatesh Madhav Bhat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=MDD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Venkatesh Madhav Bhat
Date: 2014.09.11 17:17:49 +05'30'

**(व्यं. मा. भट)**

उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,

२. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,

३. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
४. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई,
६. सर्व संसद सदस्य, विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,
७. मुख्य सचिव,
८. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
९. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना), त्यांनी हे आदेश सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावेत.
१०. *प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
११. *प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
१२. *प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१३. *प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
१४. *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१५. *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा) मुंबई,
१६. *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद) मुंबई,
१७. *राज्य निवडणूक आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
१८. *सचिव, राज्य माहिती आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
१९. *महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई,
२०. *महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई,
२१. *महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर,
२२. *महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर,
२३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मुंबई (प्रसिध्दीकरिता ५ प्रती)
२४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधान भवन, मुंबई ४०० ०३२ (१० प्रती)
२५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२७. मुख्य लेखापरीक्षक (निवासी लेखे), कोंकण भवन, नवी मुंबई,
२८. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६ वा मजला, विधान भवन, मुंबई ३२ (१० प्रती)
२९. सर्व विभागीय आयुक्त,
३०. सर्व जिल्हाधिकारी,
३१. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
३२. बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई -१ (५ प्रती)
३३. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरॅक नं.१ योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई -२० (५ प्रती)
३४. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस. व्ही.पटेल रोड, मुंबई- ४ (५ प्रती)
३५. भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई- १३ (५ प्रती)

३६. इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई- २५ (५ प्रती)

३७. नॅशनलिस्ट काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई -२१ (५ प्रती)

३८. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई- २८ (५ प्रती)

३९. सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख/ प्रादेशिक विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख (मंत्रालयीन विभागांमार्फत)

४०. मंत्रालय मध्यवर्ती ग्रंथालय, मंत्रालय, मुंबई (२ प्रती)

४१. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,

*पत्राने

## परिशिष्ट -"अ"

# स्थायित्व प्रमाणपत्राचा नमुना

याद्वारे प्रमाणित करण्यात येते की, शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः स्थाप्रप-१४१४/(प्र.क्र.७३/१४)/१३-अ, दिनांक ११ सप्टेंबर, २०१४ मधील सूचना क्र. १ येथे विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या सर्व शर्ती खाली नमूद करण्यात आलेल्या अस्थायी शासकीय कर्मचाऱ्यांच्या बाबतीत पूर्ण झालेल्या आहेत आणि त्यानुसार ते कर्मचारी आवश्यक त्या सर्व प्रयोजनार्थ त्यांच्या नावासमोर स्तंभ-२ मध्ये नमूद केलेल्या पदावर स्तंभ-३ मध्ये नमूद केलेल्या दिनांकापासून स्थायी शासकीय कर्मचारी म्हणून समजले जाण्यास पात्र आहेत.

| शासकीय कर्मचाऱ्याचे नांव व त्याचे सध्याचे पदनाम. | ज्या पदावर स्तंभ क्र.१ मधील कर्मचाऱ्यांस स्थायित्व प्रमाणपत्र देण्यात येते त्या पदाचे पदनाम. | कोणत्या दिनांकापासून देण्यात आले. |
|---|---|---|
| १ | २ | ३ |

---

दिनांकः-

सक्षम प्राधिकाऱ्याची सही व पदनाम

कार्यालयाचे नांव व पत्ताः